


राज्य मराठी विकास संस्था
(महाराष्ट्रशासन पुरस्कृत)
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय,
३, महापालिका मार्ग,
धोबीतलीव, मुंबई – ४००००१
रजि नं. एफ १६०९४ (मुंबई)
दूरध्वनी : २२६५३९६६/ फॅक्स : २२६३१३२५
Email rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क्र./ २०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ह्या प्रकल्पांतर्गत उपलब्ध होणारे ग्रंथ व नियतकालिके प्रतिमुद्राधिकार अधिनियमाची मुदत उलटलेले असल्याने सार्वजनिक स्वरूपात उपलब्ध आहेत. ही सामग्री विविध ग्रंथालयांनी जतन करून ठेवल्यामुळेच आज आपल्याला उपलब्ध होत आहे.

सदर पुस्तके अथवा नियतकालिके जशी उपलब्ध होत जातील तसे त्यांचे संगणकीकरण करून जनतेला ती उपलब्ध करून देण्यात येतील. ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

०१ सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

०२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

०३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

०४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

॥ श्री ॥

# काव्येतिहास-संग्रह.

भुजतरुवनच्छायां येषां निषेव्य महौजसां
जलधिरसना मेदिन्यासीदसावकुतोभया ।
स्मृतिमपि न ते यान्ति क्ष्मापा विना यदनुग्रहम्
प्रकृतिमहते कुर्मस्तस्मै नमः कविकर्मणे ॥

राजतरंगिणी.

पुस्तक ६. जून १८८३. अंक ६.

हे मासिक पुस्तक
पुणें येथें
ज्ञानप्रकाश छापखान्यांत
छापिलें.

किंमत ८ आणे.



अनुक्रमणिका

# विक्रीस तयार.

खालीं लिहिलेलीं उपयुक्त व मनोरंजक पुस्तकं हा आमच्या आफिसांत तयार ठेविलीं आहेत. खालीं नमुद केल्याप्रमाणें पैसा पाठविल्या असता लिहून आलेल्या पत्त्यावर रवाना करण्यांत येतील. पैसा रोख आल्याशिवाय पाठविलीं जाणार नाहींत.

काव्येतिहास संग्रहाचे व्यवस्थापक.

| पुस्तकें | किंमत रु० | टपाल खर्च. |
| --- | --- | --- |
| १ पेशव्यांची बखर | २८१,२ | ८२ |
| २ भाऊ साहेबांची बखर | २८८ | ८२ |
| ३ मुक्तेश्वरकृत वनपर्व | ७ | ८७ |
| ४ वामनो प्रकरणें ४५ | २ | ८२। |
| ५ विठ्ठलकृत बिल्हण चरित्र [सुटे कागद.] | ८२ | ८। |
| ६ शिवछत्रपतीचें चरित्र | १ | ८१॥ |
| ७ साष्टीची बखर [सुटे कागद] | ८४ | ८। |
| ८ ब्रह्मेंद्रस्वामींचें चरित्र [किता] | ८५ | ८१ |
| ९ विठ्ठलराव विंचुरकर यांची कारकीर्द [ ,, ] | ८२ | ८॥ |
| १० संभाजी व राजाराम यांचीं चरित्रें. [ ,, ] | ८१४ | ८१। |
| ११ कालेयकुतूहल प्रहसन [ संस्कृत ] [ ,, ] | ८५ | ८१ |
| १२ राजव्यवहारकोश | ८७ | ८१ |
| १३ पुष्पबाण विलास [ मराठी ] | ८१॥ | ८८६ |
| १४ अमरुशतक [ मराठी ] | ८६ | ८८६ |
| १५ परशुरामपंत भाऊंचें चरित्र | १ | ८१ |

# विषयक्रम.

**बखरी.**



**मराठी कविता.**



**संस्कृत काव्यें.**

चादर बहुमान वगैरे देऊन बिदा केले. यांच्या बरोबर राजमंडळीपैकीं मंडळी पाठविली ती येणेंप्रमाणें:—

१. कोन्हेर राम मुजुमदार आपले तर्फेनें राजानें दिलेले दिवाण.

१. रखमाजी गणेश परभू चिटणीस, गोविंद खंडेराव चिटणीस यांचे मामे भाऊ, यांचे स्थळीं वहिवाट गंगाधरराव माधव चिटणीस हजर आहेत.

१. गोविंदराव खंडेराव चिटणविसानें रखमाजी गणेश यांचे तैनातीस लिहिण्याचे कामीं नरसिंगराव चिमाजी प्रभु दिले याचे पुत्र दोघे आहेत व नातू एक

१. भास्कर राम यांजकडे फौजेचे कामीं वहिवाट करावी. यांचे वंशापैकीं रामचंद्र काशी हल्लीं हजर आहेत.

१. यशवंतराव पोतनीस राजाचे याजकडील शंकराजी रखमाजी पोतनीस व नामदारखाना व कोठीचें काम सांगितलें. यांचे वंशीं खंडो भगवंत चिटणविसीचे इल्लख्यांत हजर आहेत.

१. महादजीपंत प्रभु फडणवीस आप्पा बळवंत यांचे तर्फेनें त्यांचे वंशस्थ.

१. त्र्यंबकाजीपंत व राघोपंत बक्षी, कडेबाळीकर यांचे वंशस्थ भाऊबंद, गोपाळ भगवंत व त्र्यंबकराव भगवंत आहेत. त्यांचे मुतालिक अवधूतपंत हुशंगाबादेचे पलीकडेस नर्मदा उतरून घाटावर तोफखाना ठेवून, जानोजी भोंसले पुढें माळव्यांत नानासाहेब पेशवे यांचे भेटीस गेले. पाठीमागें भोपाळकरांनीं तोफखान्यावर गर्दी करून डोकीं कापलीं. त्यांचे पुतणे नातु वगैरे हल्लीं बक्षीगिरीवर आहेत.

१. रघुनाथ भट झिंपरे यांचे तर्फेचे शिक्केनवीस अनंतभट चितळे यांचे वंशज.

१. वेदमूर्ति विश्वंभर वैद्य हे गोविंद खंडेराव चिटणीस याजकडील रखमाजी गणेश चिटणवीस याजबरोबर येथील संस्थानांत आले. त्यांचे पुत्र दादा वैद्य, त्यांचे चिरंजीव विश्वंभर वैद्य हजर आहेत.

---
९.

या शिवाय सोयरे व मानकरी व मुत्सद्दी राजमंडळाकडील आले त्यांचीं नांवें पृथक पृथक लिहिलीं असतां विस्तार फार होईल, याजकरितां लिहिलीं नाहीत. परंतु त्यांचे वंशज कोणी कोणी आहेत.

---

६०. रखमाजी गणेश यांचा व यांचे कुळाचा इतिहास 'कायस्थ प्रभूंच्या इतिहासाचीं साधनें' या मासिक पुस्तकाच्या पहिल्या वर्षाच्या ५व्या अंकांत दिला आहे.

६१. नागपूरकर भोंसल्यांची बखर पृ० १ पहा.

## सरदार मंडळीपैकीं तपशील.

१ तुळजो राम, यमाजी शिवदेव प्रतिनिधीचे कारभारी, त्यांचे तर्फेचे यांचे वंशज.

१ बाबाजी घाडगे झुंझरराव.

१ संभाजी शिरके. जानोजी भोंसले यांचे मामा. यांचे वंशज, गुणाजी शिरके हजर आहेत.

१ जानराव गुजर, शिदोजी गुजराचे तीर्थरूप.

१ नरसिंगराव बुवाजी परभु यांचे चुलत बंधु, काशीराव लक्ष्मण हे गडबारीस गोसाव्यांचे लढाईंत मारले गेले. यांचे पुत्र त्र्यंकटराव व लक्ष्मणराव व महिपतराव काशी. त्यांजपैकीं त्र्यंकटराव यांचे पुत्र जगजीवनराव त्र्यंकटेश, व लक्ष्मणराव यांचे पुत्र जीवनराव लक्ष्मण व महीपतराव काशी हे संबळपुरचे मोरच्यावर गोळी लागून मारले गेले. त्यांचे पुत्र, सखाराम महिपत व कृष्णराव महिपत व शिवराव महिपत हे हजर आहेत.

१ नरोजी जाचक यांचे वंशज, त्याचे नातू मल्हारराव जोत्याजीराव व नरोजी जाचक हजर आहेत.

१ गिरमाजी खंडेराव यांचे—

१ शिवजी केशव टाळकुटे यांची नकल झाली, हल्लीं त्याची सून हजर आहे.

१ बिंबाजी वाजाळ.

१ आनंदराव वाघ यांचे वंशज हजर आहेत.

१ रघोजी करांडे.

१ दिनकर विनायक व शिवाजी विनायक व उमाजी विनायक. दिनकर विनायकाचे पुत्र महिपतराव दिनकर, व महिपतराव दिनकराचे पुत्र बळवंतराव महिपत. व शिवाजी विनायकाचे नकल जाले. व उमाजी विनायकाचे पुत्र बाळनाथ उमाजी व बळवंतराव महिपत हजर आहेत.

१ त्रिंबकजी गव्हाणे.

१ त्रिंबकराव कान्हो राजमंडळांत बुऱ्हाणजी मोहिते त्याचे पुतणे. मानशिंगराव मोहिते याजला सोयरीक प्रकरणावरून रघोजी बोवांनीं आणविले, त्यांचे वंशज गोविंदराव त्रिंबक व नारायणराव यशवंत हजर आहेत.

१४

साप्रमाणें सातान्याहून रघूजी भोंसले सेनासाहेबसुभा जमावानिशी यां-

टावर जालेल्याचे मैदानांत आले. तंव आंटोळे[62] समशेर बहादुर मातबर सरदार मागींत आडवे जाले जे, "आम्ही आपले मुलखांतून जाऊं देणार नाहीं, मुलुख खराब होतो. तुमची वाट नांदेड वखातीचे मार्गे सेनासाहेब सुभा यांची जुनी आहे तिकडून जाणें." तेव्हां अडचण पडली. याजवरून दिनकर विनायक व शिवाजी विनायक याचे चुलत बंधु यशवंतराव पिलाजी परभू हे आटोळ्याचे दिवाण राजमंत्री कारभारी होते त्यांशीं संधान करून सरकारचे ताकिदपत्रें महाराज राजश्रींचे आटोळे यांचे नांवें होतीं, त्यास देऊन समशेर बहादरांचा भाऊपणा ठरवून भेटी झाल्याबरोबर हरवळीस चार हजार फौजेनिशीं कृष्णाजी आटोले समशेर बहादुरांकडून समागमें घेऊन पुढें चालले. सेनासाहेब लाखणवाड्याचा घांट उतरून बाळापुरचे सुमारास आले. कांहीं फौज तेथें ठेऊन तीस हजार फौजेनिसीं वऱ्हाड प्रांतीं खंडण्या घेण्याचें सुरू केलें. तेव्हां कान्होजी भोंसले भांबे[63] येथें मोगलाई आश्रा करून होते. ते समयीं बावा साहेबाची फौज आली, ह्मणून तेथून निघोन वशिष्टेचे आलीकडे आले. त्याचे मागें बावा साहेबानीं फौजे सहित पिछा करून वणी[64] जवळ आटोपिलें. सरकार इतराजीमुळें कान्होजी बुवाची फौज तौरान[65] होऊन अफरातफर झाली. थोडासा जमाव होतां त्याजला फौजेनें वेढा घालून बावा साहेबांसमोर येऊन उभे राहिले. आणि खुरनिस[66] केली. पालखींत बसावें ह्मणोन विनंति केली. त्या समयीं त्याजला मनस्वी बोलूं लागले. तेव्हां त्यांजला धरून कैद केलें. तसेंच घेऊन वऱ्हाडांत आले. व शजूरची छावणी मुकरर केली. तें मकाण वाऱ्हाटी जवळ आहे. बंदोबस्त करण्यास सहा वर्षे लागलीं. आकोलें येथें अलजपुरचे सुभ्याकडील मातबर सरदार पठाण नामें सुजायतखान होता त्याजला त्यास जोरतलबी अमलाकरितां, ब्राह्मणावरून खिस्सा होऊन लढाई झाली. पठाणाची सिकस्ती होऊन त्याची नोबद पाडाव करून आणली. ती हल्लीं सरकारांत आहे. असें जागजागीं दोन तीन लढाया आणखी झाल्या.

तंव देवगडकर राजे चांद सुलतान[67] याचा इतिकाळ होऊन त्याचे पुत्र वडील मीर बहादर व राजे अखबरशाहा व बुराणशाहा खांसे व राखीचा वालीशाहा यांचा कलह अपसांत उभा राहून अखबरशाहा व बुराणशाहाचे वडील

---

६२. आटोळे सरदारानें अडविलें तेव्हां रखमाजी गणेश यांचा रघोजीस पुष्कळ उपयोग झाला.

६३. भाम—हा गांव वऱ्हाडांत यवतमाळ शहरापासून सुमारें ८।९ कोस आहे. लेखांक १ ला टीप ७ पहा.

६४. सन १७३० मध्यें वणी तालुक्यांत पकडिलें. लेखांक १ ला टीप १० पहा.

६५. पराभूत—हैराण.

६६. खुरनीस=खुरनिसात्=नम्रतेनें सलाम करणें.

६७. लेखांक २ टीप ३० पहा.

बंधु मीर बहादरशा याजला बालीशाहांनीं जिवें मारिलें. याजवरून रतनकुवर राणी उभयतांची मातोश्री इजला बहुत दुःख होऊन पत्रें सेनासाहेबांकडे पाठविलीं. संवत १७९३ चे सालीं सके १६५८ बशिष्ठा उतरून फौजेसहित जमावानिशीं रघूजी भोंसले सेनासाहेब सुभा केलझरचे सुमारें राणीचे पत्राअन्वयें येऊन परस्पर पौंवनी येथें जाऊन लढाई करून ठाणें घेऊन तेथें तुळजोरामपंत याजला फौज थोडकीशी देऊन ठेविलें.

[ पुढें ] सेनासाहेब फौजेसहित आपण भंडाऱ्यास येऊन देवबाबा संत याचें दर्शन घेऊन पायांवर डोई ठेऊन रामदास स्वामींचे सांप्रदायी शिवाजी महाराजांस अनुग्रह त्यांचा, या अर्थें जाणोन नंतर प्रसाद मागितला, आणि संतबावाचे खांद्यावरील धोकटी होती ती आपले खांद्यावर घेऊन त्यांतील अन्न घेऊन प्रसाद भक्षिला. आणि पुढें गोंडावर कमरबाही करून नंतर पिराशा बोबाचें दर्शन घेऊन दुवा घेऊन भौंनोरें येथें मोरचे बसविले.

हें वर्तमान देवगडास बालीशा राजे याजला समजलें. तेव्हां त्यांनीं आपला दिवाण रघुनाथसिंग नामें होता त्याजला समागमे फौज देऊन सेनासाहेबांचे मोकाबल्यास पाठविलें. तो दर मजल येऊन पोहोंचले, ते समयीं रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांचे फौजेचा मुक्काम, मौजे शिरस घांट प्रगणे भानार गंगापार तेथें होता; तशांत दिवाण मजकूर जमावानिशीं आले. लढाईचा नक्षा उभा राहिला. ते समयीं सेनासाहेबानीं करांडे यांशीं सल्ला करून कांहीं जमाव सोनबरडीचे सुमारें ठेवून, व कांहीं जमाव गिरोली परगणे भानार येथें ठेविले. व दोहीं बाजूस आपली फौज करून मध्यंतरीं रघुनाथसिंग दिवाणाचा जमा घेरून सेनासाहेबांनीं पळ काढिला. गोंड हौंवभरी होऊन मागें लागले ते समयीं डोह नदीचा आडवा होता त्या ठिकाणीं मिरनगर सोनबरडी पावेतों एकच डोह होता त्या जाग्यावर लढाई उभयतां फौजेशीं चांगली झाली. त्या काळीं रघुनाथशिंगाची शिकस्ती होऊन दिवाणा कडील बहुत लोक मारले गेले. त्या प्रसंगीं रघुनाथसिंग जखमी होऊन खेतास राहिले. वरकड त्याची जमात, त्या ठिकाणीं डोहांत बुडाली आणि सेनासाहेबांनीं दिवाणास उचलून आणून त्याच्या जखमाच्या मरामती करविल्या आणि त्याजला फितुरांत घेऊन त्याशीं स्नेहभाव केला. आणि सांगितलें कीं "बालिशास हस्तगत करून दिल्यास तुझें चालवूं." याप्रमाणें त्याणें ही कबूल केलें.

---

६८. लेखांक २ टीप २१ पहा.

६९. या साधुपुरुषाविषयीं कांहीं माहीती मिळत नाहीं. आमच्या भंडारा येथील मित्रांनीं या गोष्टीकडे लक्ष पुरवावें.

७०. भानार=भानोरें=भंडारा.

७१. आशायुक्त, अति सारा.

७२. पराभव.



अनुक्रमणिका

यास त्याजला देवगडास रवाना केले व आपण भानार येथें मोरचे बसवून लढाई सुरू केली. त्या काळीं किल्ल्यांत भामाग्याचे हरी पाटील किल्लेदार होता यानें बत्तीस दिवस किल्ला लढविला. शेवटीं फितुरांनीं सेनासाहेबा कडील सरदार रघूजी करांडे यांणी त्या पाटलास धरून आणिलें. त्या वेळेस सेनासाहेबांनीं आज्ञा केली कीं "यांजला जिवें मारावें." त्यावरून करांडे मजकूर यानीं त्याज विषयीं विनंती करून पाटलाचा प्राण वांचविला. आणि भानार येथील किल्ला हस्तगत करून ठाणें बसविलें.

तेथून कूच करून रामक्षेत्रास[७३] फौजे सुद्धां गेले. तेथें अंब कुंडावर स्नान करून नवस केला जे "आजची कार्य सिद्धी झाल्यास गडावर रामचंद्रजीची स्थापना करून जागा ब्राम्हणास अग्रहार[७४] धर्मादाय देऊं". असा निश्चय करून निघाले.

तसेच फौजे सहित देवगडास गेले तेथें किल्ल्यांत वालीशा होता. ते प्रसंगीं दिवाणांनीं वालीशास सांगून पाठविलें की "आपण किल्या बाहेर यांव, बंदोबस्त आम्हीं चांगला केला आहे." याजवरून ते बाहेर आले तसेच सेनासाहेबांनीं आपले फौजेचा वेढा त्याचे जमावासि घालून वालीशास धरून कैद केले. तसेच तेथून रतनकुवर राणीची भेट घेतली. अकबरशा व बुराणशा राजे यांच्या ही भेटी झाल्या. बोलणी करारामदाराचीं झालीं. त्यासुद्धां रघोजी भोंसले सेनासाहेब यांणी राणी सुद्धां उभयतां बंधु राजे यांजला घेऊन नागपुरास आले.

तशांत वर्तमान समजले कीं ब्रम्हपुरीवाले[७५] यांनीं काहीं जमाव पवनीचे सुमाराम पाठवून वाटा मारितात. ही बातमी कळतांच रघूजी करांडे याजला पुढें फौज देऊन ब्रम्हपुरीस पाठविलें. मागाहून आपण ही कांहीं फौज नागपुरीं ठेवून ब्रम्हपुरीस गेले. तेथें किल्ल्यांत खमेनसिंग जमादार व आभीराय[७६] नामें दोघे भाऊ जमयतीनिशीं होते. त्यांनीं बारा दिवस किल्ला भांडविला. शेवटीं हल्ला लढाई करून सेनासाहेबांनीं व त्यांचे सरदारांनीं किल्ला हस्तगत केला. जे वेळेस करांडे खमेनसिंगास धरून आणिलें ते वेळेस सेनासाहेबां-

---

७३. रामटेक. ह्या क्षेत्राची फार ख्याति आहे. ह्याच्या आसपास उत्तम विड्याचीं पानें होतात. येथें पहाडाचे माथ्यावर रामाचें प्रख्यात देवालय आहे. कार्तिकी पौर्णिमेस येथें मोठी यात्रा भरते. देवस्थानाचें उत्पन्न भोंसले राजानीं दिलेलें मोठें आहे व देवस्थानाचा कारभार पाहण्यास हीं एक मंडळी नेमली आहे.

७४. अग्रहार=अग्राहार "ब्राह्मणार्थे कुटुंबपोषणद्वारा ईश्वरप्रीत्यर्थं राजादिक जमीन, ग्राम, इत्यादि दान देतात तो"

७५. ब्रह्मपुरी हें शहर चन्द्रापुराच्या ईशान्येस ३० कोसांवर आहे.

७६. 'आणीराय'=असेंही होईल.

नीं आज्ञा केली कीं "याजला जिवें मारावें." ते वेळेस करांडे यांणीं विनंति केली कीं "ऐसा जवामर्द मनुष्य मारणें सल्ला नाहीं. त्यांचे हातून पुढें [७७]लांझीचा उद्योग करणें जरूर आहे. यास्तव याजवर सर्फराजी करावी. व भानेरे येथील किल्लेदारी याजकडे द्यावी." याजप्रमाणें बोलून माफ करविलें.

सेनासाहेबांनीं तेथील ठाणें बसवून फौजेसुद्धां कूच करून भानाऱ्यास आले. त्या प्रसंगीं भानारे येथील विचार पाहिला तर हरी पाटील याचा डौल [७८]दंदलीचा दिसूं लागला. हें चांगलें नाहीं याजकरितां खेमनसिंग जमादार याजला किल्लेदारी भानार येथील देऊन सेनासाहेब नागपुरास गेले. तेव्हां त्या संधींत अकबरशाहा पळून एलिचपुरास असफजाहाकडेस जाऊन राहिले होते. रतनकुंवर राणीचें बोलणें रघोजी भोंसले यांसी पडलें कीं "दोवे पुत्र माझे आहेत. तिसरे तुम्ही आहांत. तीन हिस्से आमचे राज्याचे करावेत." याप्रमाणें नेम ठरवून एक हिस्सा गोंडवण प्रांतांचा, त्यांत किल्ले पवनी व मारूड व मूळतापी बरघाट हे खांसाहेबांस त्यांनीं आपले संतोषानें दिले. संवत १७९४ शके १६५९ फसली सन ११४५ चे सालीं करार मदार लिहून खेरिज खंडणी दहा लक्ष रूपये नगदी स्वारीखर्च दिला. रघुजीबोवा शिपाई दोस्त एक पैसा जवळ न ठेवितां तमाम फौजेस खर्चास देऊन फौजेस रजावंतीनें ठेवित होते. व अडचणीचे प्रसंगास कोणासही शब्द टाकिल्यास माघारें घेत नव्हता. व कूचमुक्काम कोणासच कळवूं- नये. हरवक्त म्हणत असावें. "जें राम करील तें खरें." जवामर्दी जातीनीं करावी. ऐष आराम बिलकूल नाहीं. घोड्यावरच्च भाकर खावी. याप्रमाणें चाल धरणा सेनासाहेब ठेवून होते. वाटणीचा बंदोबस्त होऊन आपणास जागा छावणीस नागपुर नेमस्त करून पुढें छत्तीसगड बंगाला येथें तुळजो राम याजला फौजेसुद्धां रवाना करावें हा बेत होता. तो राहून तुळजोपंतास गोंडवाण प्रांतीं ठेविलें. आणि आपण वऱ्हाडप्रांतीं जाऊन, तसेंच साताऱ्यास जाऊन राजदर्शन घेतलें. [७९]राजश्रीस बहुत संतोष झाला. महाराज कृपावंत होऊन शके १६६० अरबी सन ११३९ चे साली सनदा दिल्याः—

१. सनद एक खास दस्तुर फौजेचे बेगमीबद्दल दिले. सुभे आठ बितपसील.

| | |
|---|---|
| १ सुभा लखनौ. | १ सुभा बेदर. |
| १ सुभा मकसुदाबाद. | १ सुभा ढोका बंगाला. |

---

७७. लांजी हा गांव बालाघाट जिल्ह्यांत भंडाऱ्यापासून ५० कोसांवर आहे. हें शहर गोंड लोकांचें वसतिस्थान होतें.

७८. फितुरीचा.

७९. शाहू महाराज.

| | |
|---|---|
| १ सुभा बितीयाचा. | १ सुभा इलहाबाद. |
| १ सुभा बुंदेलखंड. | १ सुभा हजीपुर पटणे. |
| ४ | ४ |

८

येणेप्रमाणें करून दिलें. सुरुसनतिसा सिलासेन मयातैन अल्लफ.

१ चौथ मोकाशाच्या सनदा करून दिल्या.

| | |
|---|---|
| १ प्रांत देवगड. | १ प्रांत बर्गड. |
| १ प्रांत गढ. | १ प्रांत चांद दरोबस्त. |
| २ | २ |

४

सदर्हूप्रमाणें लिहिलें.

येणेंप्रमाणें देऊन सरकारचा हुकूम झाला कीं " चंदीचंदावरास फत्तेसिंग राजे भोसले याची रवानगी आहे त्या समागमें हमराह होऊन फौजेसुद्धां जाऊन सरकारचे भाऊबंद आहेत त्यांजला चंदा साहेबांचा उपद्रव होऊन परागंदा झाले. याजकरितां शत्रूचें पारिपत्य घडावें." सरकार आज्ञा शिरसावंद्य करून चंदावरीस जाण्याकरितां वऱ्हाडास आले ते वेळेस देवगड प्रांतीं येऊन फौजेचा बंदोबस्त तुळजो राम याजकडेस नेमिला. महाली मुलकी देवगडची फडनवीसीचें काम गोपाळ रघुनाथ याजकडे सांगितलें. व छत्रवाले बिश्वनाथ कोन्हेर व कारभारी बगूजी बाबूजी जोशी पवनीकर असे नेमस्त करून आपण नांदेडास वसती करून हैदराबादचे जिल्ह्यांतून चालले. समागमें फौजे पावेतों सरदार रघूजी करांडे व कृष्णाजी आटोले व नऱ्होजी जाचक व शिवाजी केशव टाळकुटे यासहित सन ११५१ फसलीचे सालीं चंदावरास फत्तेसिंग राजे भोंसले याजला सामील झाले. जागजागीं खंडण्या घेऊन चंदासाहेबांचे फौजेशीं लढाया मात्तबर घेण्यांत आल्या. तिकडील फौजेची शिकस्त आपलेकडील फत्ते होऊन चंदासाहेबास धरून कैद केलें. फौजेंत लूट ही मनस्वी आली. चांगली जागा हस्तगत करून राजश्रीचे भाऊबंद परागंदा झाले होते ते आपले स्वस्थळास स्थापित केले आणि जागजागीं खंडण्या घेऊन चंदावरच्या नौबती दोन पाडाव आणिल्या. एक सरकारांत आली ती सांप्रत सरकारांत सेनासाहेबाचे

---

८०. लेखांक १ ला पृ० ३ ओळ ३-४ महा.

८१. दोस्त अलीचा जांवई.

८२. तंजावर.



अनुक्रमणिका

वाजत आहे व दुसरी कृष्णाजी आठोले समशेर बाहद्दराकडील त्यांचे येथें आहे. दोन वर्षे स्वारीस लागलीं.

बाळाजी विश्वनाथ पेशवे दिल्लीहून साताऱ्यास आले, नंतर कौल जाहला. याजवर पेशवाईचीं वस्त्रें मशारनिल्हेचे चिरंजीव बाजीराव बल्लाळ याजला देऊन हिंदुस्थानांत रवाना केलें. गुजराथेचे मार्गे फौजेसहित हिंदुस्थानांत माघारे येतांना, बडोदे प्रांतीं जागजागीं बंदोबस्त करून येत असतां त्र्यंबकराव दाभाडे सेनापति यांचे पदरीं पिलाजी गायकवाड त्याचे पुत्र दमाजी गायकवाड होते. तेव्हां दाभाडे वाट देईनात. त्या प्रसंगीं लढाईंत दाभाडे मेले व गायकवाड पंत प्रधानाशीं भेटले त्यास्तव गुजराथचा सुभा त्यांजला दिला व दाभाडे यांचीं मुलें माणसें धरून कैद केलीं व पुढें दरकूच जाऊन हिंदुस्थानांत चालले. तंव महंमदखान बंगश व झरणेपरणेवाले बुंदेले यांशीं लढाई होत होती. तेव्हां बुंदेले झरणेपरणेवाले यांनीं बाजीराव बल्लाळ पेशवे यांजला पत्र पाठवून आणविलें. बंगशाचें पारिपत्य करून बुंदेले यांणीं बाजीराव बल्लाळ पेशवे यांजपाशीं सख्यत्व करून झांशी, सागर, देववाही, काल्पी वगैरे प्रांत, गढ तिसां लक्षांचा सरकारांत पंत प्रधानाचे विद्यमानें दिला. करार करून बाजीराव पेशवे यांजला मस्तानी कंचनी त्यांनीं दिली. बहुतसें द्रव्यही देऊन रवाना केले ते साताऱ्यास जाऊं लागले. पुढें नर्मदा नदीच्या किनाऱ्यास बाजीरावाचा कौंळ ओंकार मांनधात्यावर झाला. त्यांचे पुत्र बाळाजी बाजीराव फौज समेटून साताऱ्यास गेले. कच्चें वर्तमान झाडून अत्रम निवेदन केलें. राजश्रीनीं संतोष पावून बाळाजी बाजीराव यांजला पंत प्रधानाचीं वस्त्रें देऊन मागतीं हिंदुस्थानांत रवाना केलें.

नंतर रघोजी भोंसले चंदासाहेबांसह साताऱ्यास राजदर्शनास गेले. चंदासाहेब याजला हुजूर पोहचवून झालें वर्तमान राजश्रीस निवेदन केलें. चंदासाहेबास धरून आणिलें आणि भाउबंद स्थळास कायम केले हें ऐकून राजश्रींनी बहुत खुषी मानून सेनासाहेबास बहुमान वस्त्रें देऊन गौरव केला. त्या प्रसंगीं सरकारांत विनंती केली कीं, " राणोजी भोसले संताजी भोसले यांचे भाऊ व कान्होजी भोसले येथें आहेत यांजविषयीं परवानगी दिल्यास घेऊन जाईन. आणिकही भाऊबंद आहेत याजवर कृपावंत होऊन परवानगी व्हावी. " याजवरून आज्ञा झाली. त्यावरून

---

८३. शके १६४१ त आश्वीन मासीं काळझाला.

८४. खंडेराव दाभाड्यांचा पुत्र. पेशव्यांची बखर पृ० ४७ टीप ५१ पहा.

८५. पेशव्यांची बखर पृ० ४७-४८ पहा.

८६. हा अलाहाबादेचा सुभेदार. पेशव्यांची बखर पृ० ३५।३६ पहा.

८७. पेशव्यांची बखर पृ० ५४ पहा.

८८. थोरले शाहू महाराज यांचें चरित्र पृ० ८१ पहा.



अनुक्रमणिका

पंतप्रधान यांस दादा साहेबांकडील फौजेची व दत्तपुत्र घेतल्याची [खबर] कळली तेव्हां श्रीमंत ज्येष्ठमासीं स्वारी तयार करून धोडपेस गेले. मोकबला दोन्ही फौजेचा होतां कारभारी चिंतो विठ्ठल पाडाव केले. त्यांचे बंधू मोरो विठ्ठल जखमा लागून खालीं आले. दादासाहेब धोडप किल्यावर गेले. फौज निघोन गेली. किल्ला वेढिला. तेव्हां दादासाहेब खालीं आले. त्यांस घेऊन सत्ताविसावे दिवशीं मोरो बाबूराव कारभारी यांस घेऊन सखाराम भगवंत यांसुद्धां पुण्यास आले. रामचंद्रबाबा यांचा वाडा सात मजली होता तो जळाला त्या जाग्यांत साठे व वामनभट शालिग्राम व देशपांडे यांस जागा दिल्या. त्यांनीं घरें बांधिलीं. कलम.

शके १६९० सैन ११७८. दादासाहेब यांसि वाड्यांत बंदोबस्तानें ठेऊन श्रीमंत स्वारीस निघाले. बराबर रामचंद्र गणेश व गोपाळ गोविंद व शिंदे होळकर सुद्धां वराडांत स्वारी केली. जानोजी भोंसले मोठे फौजेने चालून आले. सरकारफौजेचा दाब घेऊन पळ काढिला. मागें रामचंद्र गणेश व गोपाळराव गोविंद. त्यांचे मागें खांसे श्रीमंत पंचवीस कोसांचे मजली करून नागपूर लुटलें. देवगड चांद पावेतों मुलुकांत रंजीक केलें. खंडणी घेऊन तह जाहला. रामचंद्र गणेश व शिंदे होळकर हिंदुस्थानांत रवाना केले. श्रीमंत व विसाजी कृष्ण निघोन पुण्यास आले. कलम.

शके १६९१ सैन ११७९. खांसा स्वारी करनाटक प्रांतीं कारभारी मोरोबाबूराव बराबर नारायणरावसाहेब. जिजगल[?] किल्यावर हल्ला झाला, तेथें नारायणराव साहेब यांचे हातास गोळी लागली. किल्ला फते झाला. नंतर त्रिंबकराव मामा करनाटकांत छावणीस ठेऊन श्रीमंत पुण्यास आले. दादासाहेब वाड्यांत होते. कारभारी मोरो बाबुराव व सखाराम भगवंत. विसाजी कृष्ण व रामचंद्र गणेश व शिंदे होळकर हिंदुस्थानांत फत्तरगडावर आहेत. कलम.

शके १६९२ सैन ११८०. खांसा स्वारी निघोन तांदुळवाडी पावेतों गेली, शरीर अस्वस्थ झालें यामुळें आप्पा बळवंत यांजबरोबर फौज देऊन मामा क-

---

१४. "सु० स० तिस्सां तिस्सैन (म० अ० ११६९. इ० स० १७६८) रामचन्द्र गणेश व विसाजी कृष्ण त्रिंबक वगैरे किल्ल्याचे बंदोबस्तास होते. तेथून आल्यावर हिंदुस्थानची रवानगी झाली. ते मागती खांसा स्वारींत येऊन वर्ष प्रतिपदेस हिंदुस्थानांत गेले."

१५. पटवर्धन.

१६. राजीक—नासाडी, धुळधाणी.

१७. "सु० स० सब्बैन (म० अ० ११७० इ० स० १७६९) त्रिंबकराव विश्वनाथ कर्नाटकांत." दु० ब०.

१८. "सु० स० इहिदे सब्बैन कृष्णराव बळवंत यांस मामाकडे रवाना करून पुण्यास आले." दु० ब० कृष्णराव बळवत हेच आपा बळवंत. हे बळवंतराव गणपत मेहेंदळे पाणिपतच्या लढाईत पडले त्यांचे चिरंजीव. भाऊ साहेबांची बखर, शेवट पहा.

डे करनाटकांत रवाना केले. खांसे पुण्यास आले—कारभारी मोरो बाबूराव. सखाराम भगवंत घरीं. दादासाहेब वाड्यांत. शिंदे होळकर विसाजी कृष्ण रामचंद्र गणेश हिंदुस्थानांत. त्रिंबकरावमामा करनाटकांत. कलम.

१ शके १६९३ सनें ११८१. खांसे स्वारीस निघोन शरीरास विकृती झाली सबब घरास आले. नारायणराव पुण्याहून श्रीमंतां कडे गेले. रामचंद्र गणेश हिंदुस्थानांतून विसाजीकृष्ण यांचें न बने म्हणोन निघोन आले. भेटी झाल्यावर सारे पुण्यास आले. अमृतराव यांचें लग्न टोंक्यास जाहलें. शिंदे होळकर विसाजी कृष्ण फत्तरगडास. त्रिंबकराव मामा कर्नाटकांत. कलम.

शके १६९४ सनं[100] ११८२. खांशांचें शरीर अशक्त जाहलें सबब थेवरास श्रीगणपती[*] जवळ राहिले. दादा साहेब पुण्यांत वाड्यांत. करनाटकांतून त्रिंबकरावमामा स्वारी करून भाद्रपद मासीं आले. दादा साहेब वाड्यांत होते. त्यांस राम शास्त्री बावां सहित थेऊरास आणून स्नेहाच्या गोष्टी सांगून कार्तीक वद्य अष्टमी रोजीं श्रीमंतीं अवतार समाप्त केला. मोरो बाबूराव कारभारी घरीं ठेऊन सखाराम भगवंत कारभारास लाविले. नारायणराव साहेब सार्थक करावयास. संपूर्ण राजमंडळ सुद्धां थेऊरीं जमा झाले. नारायणराव बल्लाळ कारभारी सखाराम भगवंत. श्रीमंत कैलासवासी झाल्या नंतर स्वारी मार्गशीर्ष मासीं साताऱ्यास निघोन गेली. राजदर्शन झाल्यावर राजे यांणीं पेशवाईचीं वस्त्रें श्रीमंतांस व अष्टप्रधानांस चाली प्रमाणें वस्त्रें देऊन दिवाणगिरी व मुतालिकी वस्त्रें पुरंदरे यांस जाहलीं. नंतर सखाराम भगवंत व बाळाजी जनार्दन फडणीस व हरी बल्लाळ फडके व हुजूरचे दरकदार व रंगो कोन्हेर एकबोटे यांस वस्त्रें दिलीं. महाराजांचा निरोप घेऊन पंतप्रधान पुण्यास आले. दादासाहेब वाड्यांत असतां त्यांची कन्या सौभाग्यवती दुर्गाबाई पांडुरंगराव बारामतीकर यांस देऊन लग्न केलें. खांसे श्रीमंत, कारभारी सखारामपंत, स्वारीस निघोन गंगापुरीं गोपिकाबाई होतीं त्यांस भेटून पुण्यास आले. दादासाहेब यांचा बंदोबस्त केला. कलम १

---

९९. "सु० स० इसन्ने सब्बैन (म० अ० ११७२ इ० स० १७७१) खांसा स्वारी कटारे [कवरे ?] यास गेली. नगर वगैरे येथें जाऊन पुण्यास आली. नारायणराव यांची स्वारी निघोन कटारे यास गेली. पुढें खांसा स्वारी बराबर आली." दु० ब०.

१००. "सु० स० सल्लास (सब्बैन म० अ० ११७३ इ० स० १७७२) नारायणराव पुण्यास कारभारास." दु० ब०.

*अष्टसिद्धि विनायकांपैकीं थेऊर येथील एक.

## कारकीर्द नारायणराव बल्लाळ.

१ शके १६९५ सनें ११८३. कारकीर्द रघुनाथ बाजीराव व मातोश्री गंगाबाई मुद्धां.

१ पंतप्रधान नारायणरावबल्लाळ कारकीर्द, कारभारी सखाराम भगवंत, शके १६९४ मार्गशीर्ष मासीं वस्त्रे झालीं तागाईत फाल्गून अखेर शके अखेर. इस्तकबिल चैत्र शुद्ध १ शके १६९५ तागाईत भाद्रपद शुद्ध १४. खांसे वाड्यांत असतां पूर्वेचे खिडकी लहान असे ती मोठी करावया करितां भिंत पाडिली होती. दरवाजा लावावा तो मिति मजकुरीं स्वारी पर्वतीस जाऊन राघोजी आंग्रे सरखेल त्यांस भेटून वाड्यांत आले. तितक्यांत तिमयाबावाचे पुत्र बाबा गोसांवी संस्थान सहित वाड्यांत आले होते, त्यांचे पंक्तीस भोजन होणें आणि वर्तमान कळलें कीं गारदी दंगा मात करणार त्याचा बंदोबस्त हरी बल्लाळ यांस सांगितला. खांसे जेऊन महालांत गेले. तों सुमेरसिंग व महंमदइसफ सरदार तल्बेचा हंगामा वाड्याजवळ येऊन पडकी भिंतीकडून वाड्यावर चढले. खरकसिंग वाड्यांत होता. तो त्यांस मिळाला. गारदी महालांत शिरले. दिल्ली दरवाजा लावून घेतला. गोळ्या चालल्या. श्रीमंत महालांतून निघोन दादासाहेब होते त्यांजकडे गेले. सुमेरसिंग मागोमाग आला. तुळाजी पवार खिसमतगार त्यानें मागें ओढिला तों चाफाजी टिळेकर खिसमतगार येऊन पोहोंचला. त्याचे गळ्यास श्रीमंतांनीं मिठी घातली. सुमेरसिंग व तुळ्या पवार यानें तरवारीचे वार टाकून दोघेही ठार केले. दादासाहेब यांस खालीं आणून चौकिखणांत बसविलें. नारोजी नाईक जासूद आला त्यास ठार मारिलें. इच्छाराम पंत ढेरे वाड्यांत गेले त्यास दरवाज्या जवळ ठार मारिलें. गाई ठार मारिल्या. हरी बल्लाळ फडके वाड्यांत जावयास गेले तों दरवाजे बंद. तेव्हां फडके व सखारामपंत बुधवारचे चावडीस जाऊन बसले. लोक व फौजा तयार होऊन शहरांतील रस्ते धरिले. दादासाहेब यांचे चोबदार लोकांस बोलावयास आले. तेव्हां सखारामपंत यांस पुसावयास आले. त्यांणीं चिठी वाड्यांत पाठविली. तिचें उत्तर आलें. ती चिठी घेऊन हरीपंत बारामतीस निघून गेले. सखारामपंत आपले घरास गेले. संध्याकाळ झाला. बजाबा पुरंदरे व मालोजी राजे घोरपडे वाड्यांत जाऊन आले. श्रीमंतांचा काळ झाला हे वर्तमान सर्वांस

---

१. "सु० स० अर्बा (सब्बैन म० अ० ११७३ इ० स० १७७३) सन सल्लास मार्गशीर्ष मासीं वस्त्रे झालीं. सन अर्बा भाद्रपद मासीं दंगा होऊन काळ झाला.

आश्विन मासीं विसाजी कृष्ण हिंदुस्थानांतून आले.

आश्विन मासीं वस्त्रे आणविलीं व खाशी स्वारी दसऱ्यास बेदराहून म (मु?) ल्हेर पावेतों गेली." हु० ब०.

२. हंगामा=आरडा ओरड, गर्दी.

३. ही चिठी व तिचें उत्तर यांत काय मजकूर होता तें कळत नाहीं.

समजलें. नंतर त्रिंबकराव मामा व सर्वत्र मिळोन श्रीमंतांचें शव पुलापाशीं नेऊन दहन केलें. भाद्रपद शुद्ध १४. दादासाहेब दुसरे दिवशीं पोशाक करून कचेरीस असतां सुमेरसिंग व महमद इसफ यांनीं तलबेचा दंगा करून तीन दिवस बसविलें. तेव्हां सखारामपंत यांनीं तलबेचा निकाल करून श्रीमंतांस मोकळें केलें. कारभार चालला. नंतर चिंतो विठ्ठल व आबाजी माहादेव, सदाशिब रामचंद्र मिळोन स्वारीस बाहेर निघोन, कार्तीक मासीं बजाबा पुरंदरे यांस सातार्‍यास पाठवून रामराजे यांचीं वस्त्रें आणिलीं. रघुनाथ बाजीराव शिक्का झाला. स्वारी बेदरास चालली. बराबर सखारामपंत व बाळाजी जनार्दन आहेत. विसाजी कृष्ण हिंदुस्थानांत होते ते फत्तरगड लुटून संपत्ती नेली होती ती जडजवाहीर वगैरे घेऊन लोकांचे फडशे करून जामदारखाना व हत्ती सुद्धां दादासाहेब यांस येऊन भेटले. बावीस लक्ष रुपये जवाहीर व जामदारखाना दादासाहेब यांणीं वाड्यांत ठेवून विसाजीपंत यांस बराबर घेऊन बेदरास गेले. नबाबाची भेट घेतली. ६५,००,००० पासष्ट लक्षांचा मुलुक माघारा देऊन पुढें गेले. सखारामपंत व बाळाजी जनार्दन निरोप घेऊन घरास आले. हरी बल्लाळ घरींच होते. पुण्यास मुतालकीवर नारो आप्पाजी होते. कर्नाटकांत स्वारी चालली. तेव्हां त्रिंबकरावमामा याबराबर बारा हजार फौज देऊन साबाजी भोंसले याजवर पाठविलें. श्रीमंत बल्लारी पर्यंत गेले. पौष अखेर पुण्यांत नारायणराव साहेब यांची स्त्री गंगाबाई गरोदर होती ती निघोन पुरंदरास गेली. सखारामपंत व बाळाजी जनार्दन पुरंदरास गेले. नारायण आप्पाजी मुतालकीस होते त्यांनीं बाईचे हुकुमावर केशवराव कोतवाल त्यास धरिलें. पुण्यांत द्वाही फिरवून हुकूम मातोश्रींचा झाला. दादासाहेब याजबरोबर लोक गेले होते त्यांच्या घरीं चौक्या बसविल्या. त्रिंबकरावमामा भोंसल्या कडे पाठविले होते त्यांनीं साबाजी भोंसले यास अनुकूळ करून कुमकेस आणिलें. हरी बल्लाळ यांस सखारामपंत व नाना फडणवीस यांनीं त्रिंबकरावमामा यांजकडे रवाना केलें. दक्षिणेस बैदा जाहला हें समजून दादासाहेब करनाटकांतून माघारे पंढरपुरास आले. तों त्रिंबकरावमामा चालोन कासेगांव गोपाळपुरावर आले. लढाई होऊन मामा चैत्रमासीं पाडाव गेले. हरी बल्लाळ फौजे सुद्धां निघोन निजामअल्लीस भेटले. कृष्णराव बल्लाळ यांचे विद्यमानें पासष्ट लक्षांची जहागिरी भाऊसाहेब यांनीं घेतली होती ती देऊन नबाबा सुद्धां चालून आले. दादासाहेब यांनीं दोन मुक्काम करून, कूच करून बऱ्हाणपुरास गेले.

४. पूल लकडी–मागें पृ० १९ टी० ७० पहा.

५. जो उदगीरच्या लढाईंत भाऊ साहेबांनीं मिळविला होता तो.

६. नारो अप्पाजी तुळशीबागवाले.

७. गंगाबाई.

८. पाडाव गेले=धरले गेले.



अनुक्रमणिका

मामा जखमी होते त्यांचा काल चैत्रमाशीं खडकतचे मुक्कामीं जाहला. हरी बल्लाळ नबाबाची फौज सुद्धां होती. तों अधिक वैशाख शुद्ध ७ शके १६९६ गंगाबाई प्रसूत झाली. पुत्र माधवराव झाले. दादासाहेब सातपुड्याचे डोंगर पार गेले. फौज माघारी येऊन हरी बल्लाळ यांस भेटले. बजाबा पुरंदरे व मुजुमदार व चिटणीस वगैरे निघोन पुरंदरीं श्रीमंतां जवळ आले. सखाराम भगवंत व नाना फडणीस यांस भेटले. कारकीर्द रघुनाथ बाजीराव महिने:—

८५ स्वारींत व मुक्कामीं शिक्का भाद्रपद तागाईत चैत्र अखेर शके १६९५ आठ महिने मुतालकी शिक्का चालला.

८४ पुरंदराहून मातोश्रीचा हुकूम माघ शुद्ध ५ तागायत अधीक वैशाख शुद्ध १४ शके १६९६.

---

## कारकीर्द माधवराव नारायण प्रधान.

१ शके १६९६. श्रीमंत व मातोश्री गंगाबाई व कारभारी सखाराम भगवंत व बाळाजी जनार्दन. किल्यावर राहून हुकूम चालवितात. त्रिंबकरावमामा व हरी बल्लाळ नबाबास घेऊन दादासाहेब यांचे मागें लाविले. दादासाहेब बऱ्हाणपुरावरून सातपुडा पार गेले. नबाबाची छावणी औरंगाबादेस झाली. हरी बल्लाळ खानदेश प्रांतींहून आले व श्रीमंतांस किल्यावर ठेवून सखाराम भगवंत व बाळाजी जनार्दन हे फौजे सुद्धां दादासाहेब यांची समजूत करावी म्हणून गेले. थाळनेर घेतलें. नबाब येऊन भेटले. श्रीमंतांची समजी झाली नाहीं. तेव्हां त्यांस निरोप देऊन किल्यास दाखल झाले. थालनेर बऱ्हाणपूरची स्वारी खमस सबैनांत झाली. नारो आप्पाजी पुण्यांत कामावर त्यांस किल्यावरून आज्ञा येतांच गेले. दादासाहेब यांचे बराबर लोक गेले होते त्यांचेघरीं चौक्या बसविल्या. लोक घरास आल्यावर हुकुमा प्रमाणें चौक्या उठवीत होते. मार्गशीर्ष मासीं इंग्रज कोंकणांत येऊन साष्टी किल्ला घेतला. त्याजवर विसाजी कृष्ण पाठविले. त्याजवर दादासाहेब सातपुड्याच्या डोंगरातून जातां जातां सौभाग्यवती आनंदीबाई गरोदर होतीं त्यांस मार्गींचे श्रम न सोसत सबब पवाराकडे धारेचे किल्यांत ठेवून आपण पुढें गेले. सौभाग्यवती आनंदीबाई पौष शुद्ध ६स संक्रांतीचे पूर्वीं प्रसूत होऊन पुत्र बाजीराव झाले. ती खबर किल्ले पुरंदरास आली. श्रीमंतीं वस्त्रे व इनाम दिल्हें. नारो आप्पाजी पुण्यांत होते त्यांचा काळ फाल्गुन शुद्ध ५ झाला.

---

९. "सु० स० खमससब्बैन (म० अ० ११७५ स० इ० १७७४.) खानदेशांतून हरी बल्लाळ गुजराथप्रांतीं. साष्टी मार्गशीर्ष मासीं गेली." दु० ब०.

१०. हें थालनेर 'तालनेर' असावें.



अनुक्रमणिका

त्यांचे भाचे जनार्दन आप्पाजी कारभार करूं लागले, व त्याचा पुत्र तात्या कित्याचा कारभार करूं लागले. कलम.

१. शके १६९७ सन ११८५. खांसे व कारभारी किल्यावर. कोणास येणा जाणारास परवानगी लागत होती. होळकर व महादाजी शिंदे हिंदुस्थानांतून देशीं आले. हरी बल्लाळ फौजे सुद्धां दादासाहेब ज्या मार्गें गेले तेही तिकडेच गुजरात प्रांतीं आहेत. दादासाहेब सुरतेकडे आहेत. रामचंद्र गणेश फौजे सुद्धां तळेगांवावर होते तेथून करवीरींस पाठविले. कोन्हेरराव पटवर्धन यांस करनाटकांत रवाना केलें. पुण्यांत जनार्दन आप्पाजी. कलम.

१ शके १६९८ सन ११८७. खांसा श्रीमंत व कारभारी किल्ले पुरंदरीं होते. भाऊसाहेबांच्या नांवीं पूर्वीं तोतया आला होता. त्याची चौकसी करून, बेडी घालून, किल्ले रत्नागिरीचे सुभदार रामचंद्र नाईक परांजपे, त्यांचे स्वाधीन केलें. त्यांणीं त्यास काढून, लोक जमा करून, भाऊसाहेब म्हणून किल्ले घेतले. ही खबर किल्ले पुरंदरीं आली तेव्हां महादजी शिंदे यांसि हुकूम देऊन पाठविलें त्यांनीं जुन्नर किल्यास वेढा घातला. तो तेथून पळून कुलाब्यास गेला. तेथें राघोजी आंग्रे सरखेल यांनीं धरून शिंद्याचे हवालीं केला. शिंदे पुण्यास घेऊन आले. बाबूजी नाईक वगैरे लोकांस दाखवून खोटासा निश्चय करून, उंटावर बसवून, शहरांत फिरवून कुंभारवेशीबाहेर मेकसूं घालून मारला. मार्गशीर्ष शुद्ध ७ मंगळवारीं. हरी बल्लाळ गुजरात प्रांतींहून किल्ले पुरंदरीं आले. कर्जपट्टी लोकांवर घौतली. बाजीपंत आण्णा फौज देऊन कोंकणांत पाठविले होते ते शिंद्यांनीं धरले. ते निघून करवीराकडे शिरोळ कवठ्यावर रामचंद्र गणेश होते त्यांस मिळाले. कोन्हेरराव पटवर्धन करनाटकांत होते त्यांची आणि हैदरनाईकाची लढाई झाली. पांडुरंगराव पटवर्धन पाडाव गेले. फौज कर्नाटकांत आहे. भिवराव यशवंत पानसे याबराबर तोफखाना व फौज कोंकणांत किल्ले घेतले होते त्यांचे बंदोबस्तास पाठविलें. कलम.

---

११. या गृहकलहाच्या वेळीं पेशव्यांच्या राज्यावर जे अनेक हल्ले करणारे उत्पन्न झाले त्यांपैकीं कोल्हापुरकर एक होत. दुसरे इंग्रज, हैदर, निजाम वगैरे.

१२. सु० स० सब्बांसब्बैन ( म० अ० ११७७ इ० स० १७७६ ) हरी बल्लाळ गुजराथेंतून आले. बाजी गोविंद तोतया. भीमराव पानसे कोंकणांत बंदोबस्तास. पांडुरंगराव स्वारीस कर्नाटकांत धरिले गेले. मोरो बाबूराव फाल्गून अखेर कारभार करूं लागले. रामचंद्र गणेश कोरेगांवपर्यंत होते." दु० ब०. पांडुरंगराव पटवर्धन यांस हैदरानें पिंजऱ्यांत घातलें होतें ! ! तेथेंच त्यांचा काळ झाला. मोरो बाबूराव हे मोरोपंत दादा फडणीस.

१३. ही कर्जपट्टी मोहिमेच्या खर्चाबद्दल असावी. मागें पृ. १३ टी. * पहा.

१ शके १६९९ संनें ११८७. श्रीमंत व कारभारी पुरंदरीं व जनार्दन आप्पाजी पुण्यांत. हरी बल्लाळ फौज घेऊन कर्नाटकांत गेले. महादजी शिंदे करवीरावर रामचंद्र गणेश त्यास मिळाले. तुकोजी होळकर देशीं असतां मोरो बाबूराव यांणीं मसलत करून बजाबा पुरंदरे व माधवराव निळकंठ होळकरा बरोबर पुण्यास येऊन मातोश्री पार्वतीबाई यांजला घेऊन येरवड्यावर राहिले. तेथून थेऊरावर गेले. तेथें पुरंदरींहून सखाराम भगवंत आले. फाल्गुन मासीं मोरो बाबूराव फौजे सुद्धां व होळकर सासवडास गेले. सखाराम भगवंत व नाना फडणीस नारायणा जवळ व माचीखालीं मोरोबानीं कारभार करावा म्हणों लागले. असे कांहीं दिवस गेल्यावर श्रीमंतांचा बंदोबस्त नाना व सखारामपंताचा होता. हरी बल्लाळ कर्नाटकांत होते त्यांसि बातमी कळली त्यावरून ते कर्नाटकांतून निघून माहादजी शिंदे ह्यांस करवीरीं भेटून बराबर घेऊन ज्येष्ठ अखेरीस दाखल जाहाले. सखाराम भगवंत व बाळाजी जनार्दन यांच्या भेटी झाल्या. फौज मोठी जमली. तेव्हां होळकर लुटावा तर सरदार मोठा यास्तव शिंद्यांनीं आपल्याकडे घेतलें. मोरो बाबूराव व बजाबा पुरंदरे कैद करून नगरास आषाढमासीं नेलें. बजाबास किल्यावर ठेविलें. शिंदे निरोप घेऊन जामगांवास गेले. रामचंद्र गणेश कोरेगांव पर्यंत जाऊन माघारे आले. पुण्यास कारभारी जनार्दन आप्पाजी. माहदजी शिंदे यांणीं ब्रऱ्हाणपूर शहर व अशेर किल्ला व जहागिर श्रीमंतां जवळून घेतली. कारभारी बाळाजी जनार्दन आणि सखाराम भगवंत कैदें करून आपण शिंदे हिंदुस्थानांत गेले. कलम.

१ शके १७०० सन ११८८. श्रीमंत[व] कारभारी पुरंदरीं होते. दादासाहेब यांनीं इंग्रज बरोबर घेऊन बोरघाटास आले. तेव्हां महादजी शिंदे जामगांवींहून घाटतोंडीं आले. नाना फडणवीस व सखारामपंत हे फौजेसुद्धां आले. इंग्रजांचे विद्यमानें दादासाहेब शिंद्यांकडे आले. हरिबाबा त्यांजबरोबर देऊन हिंदुस्थानांत लाविलें. इंग्रेज निघून गेले. शिंदे रहिमतपुरास गेले. तेथें शिंद्यांची कन्या बाळाबाई लाडोजी नरसिंगराव देशमूख यांस देऊन लग्न केलें. सखाराम भगवंत फाल्गुन मासीं वांईस गेले. त्यांनीं आपली कन्या सचीवाचे पुत्रास देऊन लग्न केलें. नाना फडणवीस किल्यावर होते. शिंदे लग्न करून किल्यास आले. सखाराम भगवंतही आले. श्रीमंतांची स्वारी

---

१४. "सु० स० तिस्सा सब्बैन (म० अ० ११७८ इ० स० १७७७). वैशाखमासीं स्वारी पुरंदराहून पुण्यास मुंजीकरितां आली" द्रु० ब०.

१५. नारायण कोण? सवाई माधवरावास असें म्हटलें काय?

१६. 'कैद' बाबदल 'कायम' असें असावें.



अनुक्रमणिका

किल्याखाली डेऱ्यास आली. कचेरी केली. तेथें सखाराम भगवंत कैद करून सिंहगडास पाठविलें. तेथून प्रतापगडास गेले. नंतर शिंदे निघोन जामगांवास गेले. शके मजकूरीं रामराजे यांनीं दत्तपुत्र बावीकर भोंसले यांचा घेऊन अवतार समाप्त केला. त्यांचें नांव शाहू राजे ठेविलें. चैत्रमासापासून नवी मुद्रा झाली. कलम.

१ शके १७०१ श्रीमंत पुरंदरींहून उतरून पुण्यास यावयाकरितां जेजुरीस आले. इंग्रेजांचा वकील पुण्यास आला. त्यास राहण्यास जागा मुळामुठा संगमीं दिली. श्रीमंत फौजसुद्धां चैत्र शुद्ध १ प्रतिपदेस पुण्यास वाड्यांत दाखल झाले. शिंदेही पुण्यांत आले. सरकारचे डेरे गारपिरावर उभे केले. श्रीमंतांची मुंज पर्वतीवर झाली. समारंभ मोठा केला. शिंदे वगैरे मुंजीस होते. मुंज झाल्यावर खासे वाड्यांत दाखल. शिंदे हिंदुस्थानांत रवाना केले. डेरे अखेरसालीं वाड्यांत आणिले. चिंतो विठ्ठल शिंद्यांनीं बरोबर नेले व बाजी गोविंद जोशी स्वारीस कोंकणांत. कलम.

१ शके १७०२ सन ११९० श्रीमंत पुण्यांत वाड्यांत होते. इंग्रज आला म्हणून स्वारी पुरंदरास किल्यावर गेली. हरी बल्लाळ फौजेसुद्धां इंग्रजांवर कोंकणांत गेले. नाना फडणवीस फौज घेऊन पुनवळ्यावर जाऊन राहिले. घांटाचे तोंडीं बंदोबस्त केला. पुणें पळालें. इंग्रेज पुढें आल्यावर पुण्यास आग द्यावी ही ताकीद भास्करपंत कानीटकर यांजबरोबर जनार्दन आप्पाजीस पाठविली. परंतु आगीचा प्रसंग पडला नाहीं. इंग्रज गेले. हरी बल्लाळ खालीं कोंकणांत. बाळाजी जनार्दन वरघांटीं. इंग्रेज शिकस्त होऊन गेले. श्रीमंत पुरंदरींहून पुण्यास आले. बाळाजी जनार्दन व हरी बल्लाळ येऊन भेटले. गणेशपंत [18]भोरे [ ? ] कोंकणांत ठेविले होते ते गुजरात प्रांतींहून आले. रामचंद्र गणेश कोंकणांत शांत झाले. त्यांचे पुत्र माधवराव रामचंद्र व बाजी गोविंद गुजरात प्रांतीं गेले. ते अखेरीस आले. कर्जपट्टी लोकांवर घातली. शिंद्यानीं चिंतो विठ्ठल यांस नेले होतें ते आणून किल्यावर कैद केले. ते मेले. सखाराम भगवंत रायरीकिल्यावर शांत झाले. नारायणराव साहेब यांजवर ज्यांणीं हात टाकिला त्यांचीं पारपत्यें होत आलीं. महमद इसफ व सुमेरशिंग व खरकशिंग व तुळाजी पवार वगैरे जे सांपडले ते मारिले. बजाबा पुरंदरे द्रव्य घेऊन सोडिले. मुजुमदारीवर आबा मुजुमदार केले. त्याचें घर जप्त केलें होतें.

---

१७. सखाराम बापूचें स्वदस्तुरचें फितुरी पत्र नानांच्या हातीं लागलें होतें. पेशव्यांची बखर पृ० १३१ पहा.

१८. "गणेश विश्वनाथ बेहरे पुढें गणेशपंत खानदेशांत गेले." दु० ब०

१९. वर पृ० ३० टी० १३ पहा.



अनुक्रमणिका

